राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत रनाळा-येरखेडा ता.कामठी, जि.नागपूर येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः नप्रमा-१११४/प्र.क्र.३३३ /पापु-१३

मंत्रालय,मुंबई-४०००३२

दि. २७ मार्च,२०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः क्र. ग्रापाधो- ११०९/प्र.क्र.१०४(अ)/ पापु-०७,, दि. १७ /३/२०१०

२) शासन निर्णय क्र.ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि.९/०७/२०१४

३) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.

४) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.

५) शासन निर्णय क्र.निशयो-१४१३/प्र.क्र.८८/पापु-०७,दि.११/०९/२०१४

६) शासन शुध्दीपत्रक क्र.१११४/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.१७/१०/२०१४

७) शासन पत्र क्र.१११४/प्र.क्र.२७८/पापु-१३,दि.०१/११/२०१४

८) शासन शुध्दीपत्रक क्र.१११४/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.१०/३/२०१५

९) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद अमरावती यांचे पत्र क्र.जिपना/ ग्रापापुवि / ३३०७/ २०१४,दि.१५/११/२०१४

१०) जिल्हा परिषद नागपूर सर्वसाधारण सभा ठराव दि.२८/०१/२०१५

११) मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागरी व ग्रामीण योजना ठाणे यांचे दि.०३/०३/२०१५ रोजीचे पत्र.

१२) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद अमरावती यांचे पत्र क्र.जिपना/ ग्रापापुवि / ६१०/२०१५,दि.०९/०३/२०१५

**प्रस्तावना -**

रनाळा-येरखेडा ता. कामठी जि.नागपूर या शहरालगतच्या ग्रामपंचायतीच्या संयुक्त पाणी पुरवठा योजनेस संदर्भाधिन अनु.क्र. ७ मधील पत्रानुसार तत्वत: मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजनेच्या रु.१९०९.१७ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागरी व ग्रामीण योजना ठाणे यांनी त्यांच्या संदर्भाधिन अनु.११ मधील पत्रानुसार तांत्रिक मान्यता दिलेली आहे.

प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१९०९.१७ लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रक व आराखड्यास प्रशासकीय मंजूरी मिळण्यासाठी सदर योजनेचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी संदर्भाधिन अनु क्र.१२ मधील पत्रानुसार मान्यतेसाठी शासनास सादर केलेला आहे. त्यामुळे रनाळा-येरखेडा ता.कामठी,जि.नागपूर या शहरालगतच्या ग्रामपंचायतींच्या संयुक्त पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u> -

वरील प्रस्तावनेच्या अनुषंगाने रनाळा-येरखेडा ता.कामठी,जि.नागपूर या शहरालगतच्या ग्रामपंचायतींच्या संयुक्त नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.३२३२ /-** एवढ्या दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या **रु. १९०८.२७ लक्ष (ढोबळ) ( रु.एकोणीस कोटी आठ लक्ष सत्तावीस हजार फक्त)** इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेचा वित्तीय आकृतीबंधातील शासकीय अनुदान **संदर्भाधिन अनु क्र.४ मधील शासन निर्णयानुसार राहील.**

**सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१) प्रस्तुत योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी करावी.

**२) प्रस्तुत योजनेसाठी पाणी आरक्षणाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेच्या निविदा काढण्यात येऊ नये.**

३) योजना पूर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे,हे पडताळण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संबधित ठेकेदाराशी करारनामा करतांना त्यामध्ये ही अट घालावी की,योजना पूर्ण झाल्यानंतर ठेकेदार किमान १ वर्षे सदर योजना चालवेल.

४) योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, मजीप्रा व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी करावी आणि पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्याची जबाबदारी कार्यकारी अभियंता, मजीप्रा यांची राहिल.

५) योजना पूर्ण झाल्यावर १ वर्ष योजना यशस्वीपणे चालविल्यावर सदर योजना जिल्हा परिषद,नागपूर यांच्याद्वारा हंस्तातर करुन घेतली जाईल.

६) सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी जिल्हा परिषदेने वाढ करावी. तसेच योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्या देण्याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहिल.

७) राज्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी हगणदारीमुक्तीच्या प्रचलित धोरणाप्रमाणे कार्यवाही करावी.

८) योजनेसाठी ई-निविदा बोलविण्यात याव्या.

९) वाढीव दराच्या निविदा प्राप्त झाल्यास निविदा स्विकृत करण्यापूर्वी मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची मान्यता घेण्यात यावी. जास्त दराच्या निविदेसाठी विभागाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेचे कार्यादेश देण्यात येऊ नये.

१०) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

११) योजनेचे काम मंजूर किंमतीतच पुर्ण करावे. त्यासाठी कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने कार्यवाही करावी.

१२) योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत.

१३) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची,राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधिन अनु क्र.५ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांची पुर्तता करण्यात यावी.

१४) सदर योजनेवर होणारा खर्च हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत केंद्र तथा राज्य हिस्स्यातून जिल्हा परिषदेस प्राप्त होणा-या निधीमधून भागविण्यात यावा. राज्य हिस्स्याची (५०%) तरतूद जिल्हा योजनेतून उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद नागपूर यांची राहील.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२६१७३३११६३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANKAR SURENDRA PRALHAD

Digitally signed by CHANKAR SURENDRA PRALHAD
DN: CN = CHANKAR SURENDRA PRALHAD, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION, CID - 917820
Date: 2015.03.27 10:16:43 +05'30'

**सु.प्र.चानकर**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
३. विभागीय आयुक्त,नागपूर विभाग,नागपूर

४. सदस्य सचिव,मजीप्रा,मुंबई.
५. जिल्हाधिकारी,नागपूर.
६. मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,जलव्यवस्थापन ठाणे
७. संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,नागपूर.
९. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर
१०. मुख्य अभियंता,मजीप्रा,ना.व ग्रा.योजना,ठाणे.
११. अधिक्षक अभियंता,भारत निर्माण कक्ष,विभागीय आयुक्त कार्यालय,नागपूर.
१२. अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,जलव्यवस्थापन मंडळ,नागपूर.
१३. अधिक्षक अभियंता,मजीप्रा,ना.व ग्रा. योजना मंडळ,नागपूर.
१४. कार्यकारी अभियंता,म.जी.प्रा. ना. व ग्रा. योजना विभाग,नागपूर.
१५. कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,जलव्यवस्थापन विभाग,नागपूर.
१६. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,नागपूर.
१७. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
१८. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
१९. प्रधान सचिव,पा.पु.व स्व.वि.यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
२०. मु.अ.तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
२१. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन क्र. १,४,५,६,९,१७ व १८.
२२. निवडनस्ती पापु-१३,पा.पु.व स्व.वि.मंत्रालय,मुंबई.